20110521104937001

<u>नगररचना योजना क्र. ३ - जळगांव</u>
महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम ९१(२) अन्वये अधिसूचना..

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२**
**शासन निर्णय क्रमांक: टिपीएस-३५११/८३९/प्र.क्र.९९/११/नवि-९,**
**दिनांक : १२ मे, २०११.**

**शासन निर्णय**:- सोबतची अधिसूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द करावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(प्रदीप गोहिल)
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
२) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) जिल्हाधिकारी, जळगांव.
४) आयुक्त, जळगांव महानगरपालिका, जळगांव.
५) उप संचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक.
६) सहायक संचालक नगररचना, जळगांव शाखा, जळगांव.
७) व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे.
(त्यांना विनंती की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात नाशिक विभागीय पुरवणी भाग-एक मध्ये प्रसिध्द करुन त्यांच्या प्रत्येकी ५ प्रती या विभागास व संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पाठवाव्यात.)
८) कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी.)
९) निवडनस्ती (कार्यासन नवि-९)

**नगररचना योजना क्र. ३ - जळगांव**

महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम ९१(२) अन्वये अधिसूचना..

**अधिसूचना**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : १२ मे, २०११**

***महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६***

**क्रमांक:टिपीएस-३५११/८३९/प्र.क्र.९९/११/नवि-९:**ज्याअर्थी, नगररचना योजना क्र. ३ जळगांव शासन अधिसूचना, नगर विकास विभाग क्र. टिपीएस-३५८८/९४९(अ)/प्र.क्र.११९ /नवि-९, दि. २९ मे, १९९३ अन्वये मंजूर झाली असून ती दि. २२ जुलै, १९९३ पासून अंमलात आली आहे (यापुढे "उक्त योजना" असे संबोधिलेली) ;

आणि ज्याअर्थी, उक्त योजनेतील अंतिम भूखंड क्र. ७१ च्या क्षेत्रात चूकीने ६०९.३७५ चौ.मी. ऐवजी ५८४.२५ चौ.मी. अशी नोंद झालेली असून सदर चूक दुरुस्त होणेबाबतची श्री. अभिषेक ओमप्रकाश अग्रवाल व इतर, जळगांव यांची विनंती शासनास प्राप्त झाली आहे (यापुढे "उक्त विनंती" असे संबोधिलेली) ;

आणि ज्याअर्थी, आयुक्त, जळगांव महानगरपालिका यांनी त्यांचे पत्र क्र. नर/०१२६, दि. २१ एप्रिल, २०११ अन्वये सदर अंतिम भूखंडाचे क्षेत्रात दुरूस्ती करण्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे (सन १९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३७) (यापुढे "उक्त अधिनियम" असे संबोधिलेलो) चे कलम ९१ अन्वये मान्यता मिळण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे ;

आणि ज्याअर्थी, उक्त विनंतीबाबत आवश्यक त्या चौकशीनंतर उक्त विनंतीच्या अनुषंगाने, उक्त अधिनियमाचे कलम ९१ अन्वये खालीलप्रमाणे फेरबदल (यापुढे "उक्त फेरबदल" असे संबोधिलेला) करण्याचे राज्य शासनाचे मत झाले आहे -

**फेरबदल -** नगर रचना योजना क्र. ३ जळगांव मधील अंतिम भूखंड क्र. ७१ चे क्षेत्र खालील अटीच्या अधीन राहून, ५८४.२५ चौ.मी. ऐवजी ६०९.३७५ चौ.मी. असे दुरुस्त करण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे.

**अट -** उक्त फेरबदलानुसारच्या वाढीव क्षेत्राबाबत भूखंडधारकाने, नगररचना योजनेच्या तत्वाप्रमाणे वाढीव क्षेत्राचे मूल्य व अंशदान यांचा भरणा करणे आवश्यक राहील."

आता, त्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम ९१ चे उपकलम (२) अन्वये व त्या अनुषंगाने असलेल्या इतर अधिकाराचा वापर करुन शासन याद्वारे उक्त योजनेतील उक्त फेरबदलाबाबत जळगांव महानगरपालिकेस खालीलप्रमाणे प्राधिकृत करीत आहे :-

"जळगांव महानगरपालिकेने उक्त अधिनियमाचे कलम ९१ (२) अन्वये करावयाच्या उक्त फेरबदलाचे प्रारुप या अधिसूचनेच्या दिनांकापासून सहा महिन्यात तयार करुन प्रसिद्ध करावे."

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

( प्रदीप गोहिल )
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

Town Planning Scheme - No. 3, Jalgaon

Notification under section 91 (2) of the Maharashtra Regional & Town Planning Act, 1966.

**NOTIFICATION**

GOVERNMENT OF MAHARSHTRA

**Urban Development Department**

**Mantralaya, Mumbai 400 032.**

**Dated : 12th May, 2011**

*The Maharashtra Regional & Town Planning Act, 1966.*

No. TPS-3511/839/CR-99/11/UD-9:- Whereas, the Town Planning Scheme No. 3 Jalgaon (hereinafter referred to as "the said Scheme") has been sanctioned by Government vide Urban Development Department's Notification No. TPS-3588/949(A)/ CR-119/UD-9, dated 29th May, 1993 to come into force from dt. 22nd July, 1993 ;

And whereas, Government has received a request from Shri. Abhishek Omprakash Agrawal & others, Jalgaon to rectify the entry of the area of the Final Plot No. 71 in the said Scheme which is wrongly shown as 584.25 Sq.m. instead of 609.375 Sq.m. (hereinafter referred to as "the said Request") ;

And whereas, the Commissioner, Jalgaon Municipal Corporation vide his letter No. नर/०१२६, dated 21st April, 2011 requested Government to grant sanction under section 91 of the said Act so as to rectify the area of abovesaid plot ;

And whereas, after making necessary enquiries, the Government is of the opinion that it is necessary to make variation accordingly the said Request as below (hereinafter referred to as "the said Variation") under section 91 of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (Maharashtra Act. No. XXXVII of 1966) (hereinafter referred to as "the said Act") ;

"**Variation** - In the Town Planning Scheme No. 3, Jalgaon, it is proposed to rectify the area of Final Plot No. 71 as 609.375 Sq.m. instead of 584.25 Sq.m. subject to the condition specified below -

**Condition** - It is necessary for the Plot holder to pay the contribution & betterment charges as per the principle of Town Planning in lieu of the enhanced area as per the said Variation."

Now, therefore, in exercise of the powers conferred under sub section (2) of section 91 of the said Act, Government hereby authorise the Jalgaon Municipal Corporation regarding the said Variation to the said Scheme as follows -

"The Jalgaon Municipal Corporation shall accordingly prepare and publish the draft of the said Variation to the said Scheme as per provision laid down under section 91 (2) of the said Act within a period of six months from the date of this Notification."

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

(Pradeep Gohil)

**Section Officer to Government**